माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील संचालक (माहिती) गट-अ या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन आदेश क्रमांकः मावज २०१३/७४६/प्र.क्र.२५६/का.३४ अ,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: १० जुलै, २०१५

**शासन आदेश-**

१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील संचालक (माहिती), गट-अ (वेतनश्रेणी १५६००- ३९१०० ग्रेड वेतन-७६००) या पदावर खालील नमूद उपसंचालक (माहिती), गट-अ (वेतनश्रेणी १५६००-३९१०० ग्रेड वेतन-६६००) संवर्गातील अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची रकाना (४) येथे त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे

| अ.क्र. १ | अधिकाऱ्यांचे नाव २ | प्रवर्ग ३ | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण ४ |
|---|---|---|---|
| १ | श्री. शिवाजी सुकदेव मानकर | खुला | संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), मुख्यालय, मुंबई |

अटी:-

१) श्री. शिवाजी सु. मानकर यांना संचालक (माहिती) या पदावरील तात्पुरती पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित/प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) वरील तात्पुरती पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात दाखल असलेल्या मूळ याचिका क्रमांक: ८४५२/२००४ वरील न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३) श्री. शिवाजी सु. मानकर यांना संचालक (माहिती) या पदावरील तात्पुरती पदोन्नती त्यांच्या ५०/५५ वर्षाच्या पलिकडे सेवेत राहू देण्याविषयीच्या शासनाच्या सर्वसाधारण आदेशाच्या अधीन राहील

४) सदर पदोन्नती ही निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळणाऱ्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१६२९१०७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2015.07.10 16:30:41 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव (मावज), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने ),
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. उपसंचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, नाशिक,
१०.उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
११.संबंधित अधिकारी (मा.व.ज. मार्फत),
१२. सा.प्र.वि./का.१३, का.१६ब व का-३४,
१३.निवड नस्ती.